**नक्षलग्रस्त आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील गावांत नक्षलवादयांना गावबंदी योजनेंतर्गत प्रोत्साहन अनुदान मंजुर करणेबाबत .**

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः नक्षल २४१४/प्र.क्र.१०८/१४ /का.१४१७**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

तारीख: १९ मार्च , २०१५ .

वाचा - **गृह विभाग शासन निर्णय क्रमांकः एनएएक्स-११०९/प्र.क्र.६२९/विशा-१ब, दि. १८ मार्च, २०११.**

**प्रस्तावना :**

नक्षल चळवळीस आळा घालण्याच्या दृष्टीने बिगर आदिवासी क्षेत्रातील गावांमध्ये नक्षलवाद्यांना गावबंदी योजना लागु करण्याचा निर्णय संदर्भाधीन शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. त्यानुसार नक्षलग्रस्त आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील ज्या गावांनी पुढाकार घेऊन नक्षलवाद्यांना गावबंदी केली आहे, अशा गावांना प्रत्येकी रु. ३.०० लक्ष इतका निधी त्या गावांच्या विकासकामासाठी प्रोत्साहनात्मक अनुदान म्हणून मंजुर करण्यात येतो. याबाबत जिल्हाधिकारी , गोंदिया यांचा विभागीय आयुक्त , नागपुर यांचेमार्फत बिगर आदिवासी क्षेत्रातील ५ गावांसाठी रु. १५.०० लक्ष निधी मंजुर करण्याबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाला असून या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

गोंदिया जिल्हयातील आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील नक्षलग्रस्त प्रभावित असलेल्या गावांत नक्षलवाद्यांना गावबंदी केल्याबद्दल प्रोत्साहनात्मक अनुदान म्हणून ५ गावांना प्रत्येकी रु. ३.०० लक्ष याप्रमाणे रु. १५.०० लक्ष (रु. पंधरा लक्ष फक्त ) एवढा निधी या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत आहे. सदरहुन निधी खर्च करताना संदर्भाधीन शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. सदर निधी जिल्हाधिकारी , गोंदिया यांना वितरित करण्यात येत आहे.

२. या अनुषंगाने होणारा खर्च "मागणी क्र. ओ-७, ३४५१ सचिवालय आर्थिक सेवा, ०९० सचिवालय, (०४) नक्षलग्रस्त भागासाठी विशेष कृती दल , (०४)(०१) नक्षलग्रस्त भागासाठी विशेष कृती दल , ३१ सहाय्यक अनुदान (योजनांतर्गत )(वेतनेत्तर) संगणक संकेतांक (३४५१०६५४) " या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. सदर निधी जिल्हाधिकारी , गोंदिया यांना अर्थसंकल्प वितरणप्रणालीव्दारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे. सदरहुन निधी त्यांनी संबंधित ग्रामपंचायतीस एकाच हप्त्यात अदा करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , गोंदिया यांना मंजुर करावा.

४. या निधीच्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास देण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील. या योजनेकरिता मंजुर करण्यात येणारा निधी विहीत मुदतीत संपूर्णत: खर्च होईल याची दक्षता संबंधितानी घ्यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३१९१११६०२८०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2015.03.19 11:26:10 +05'30'

**( वसंत कुळकर्णी )**
उप सचिव , महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
४. सह सचिव (वि. शा.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
५. जिल्हाधिकारी , गोंदीया.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी , गोंदीया .
७. जिल्हा पोलिस अधिक्षक , गोंदीया.
८. सहसंचालक, लेखा व कोषागारे संगणक कक्ष, ५ वा मजला, न. प्र. भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-३२.
९. निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. विशेष कार्य अधिकारी (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर.
१२. उपवन संरक्षक , गोंदीया.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदीया.
१४. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गोंदीया.
१५. प्रकल्प अधिकारी , एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प , गोंदीया.
१६. वित्त विभाग/व्यय-८, अर्थ-१६, साधनसंपत्ती, अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई- ३२.
१७. कार्यासन अधिकारी (का. १४११/१४१४/१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
१८. निवड नस्ती का. १४१७.